सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सहाय्यित "नव तेजस्विनी- महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" राबविण्याकरिता निधी उपलब्ध करुन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०२२/प्र.क्र.५८/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २० मार्च, २०२३.

**संदर्भ :-**

१. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२०१६/प्र.क्र.६७/का-१०, दि.८.१.२०१९ व दि.४.१.२०२१.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.४.४.२०२२ व दि.८.२.२०२३.
३. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२०२२/प्र.क्र.५८/का-१०, दि.४.८.२०२२ व दि.२३.११.२०२२.
४. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांचे पत्र क्र.माविम/लेखा/२०२३/४४४, दि.९.२.२०२३.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या अर्थसंकल्पीय वर्षात आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सहाय्यित "नव तेजस्विनी- महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" राबविण्याकरिता आयफॅडचा हिस्सा म्हणून विवरणपत्रातील रकाना क्रमांक (२) मधील लेखाशीर्ष/ उद्दिष्टाकरिता रकाना क्रमांक (५) प्रमाणे एकूण **₹२०००.०० लक्ष (अक्षरी रुपये वीस कोटी फक्त)** इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास (माविम) वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | प्रधान/ लेखाशिर्ष / संगणक सांकेतांक/ उद्दिष्ट | अर्थसंकल्पीय तरतूद | यापूर्वी वितरीत निधी | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | मागणी क्रमांक एक्स-१,<br>२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण,<br>(०३) इतर योजना,<br>(०३) (१३) नव तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला महिला उद्यम विकास प्रकल्प राबविण्याकरिता माविमसाठी सहायक अनुदान (आयफॅड हिस्सा) (कार्यक्रम),<br>(२२३५ सी ३४१)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ८०००.०० | ३३६०.०० | २०००.०० |

२. सदर निधीमधून आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सहाय्यित "नव तेजस्विनी- महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" अंतर्गत प्रत्यक्षात हाती घ्यावयाच्या शासनमान्य घटकांवरच खर्च होईल, याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

४. सदर निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाव्दारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

६. सदर निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत केल्यानंतर केंद्र शासनामार्फत आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) कडून याची प्रतिपूर्ती करुन घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला निधी चालू वित्तीय वर्षात खर्च करण्याची तसेच अखर्चित राहणारा निधी दि.३१.३.२०२३ पूर्वी समर्पित करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

८. हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४५/१४७२, दि.१५.२.२०२३ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७३/व्यय-६, दि.१०.३.२०२३ अन्वये त्या विभागांनी दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२०१६२२३१५०३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAHEBRAO DHANRAJ BHOYE

Digitally signed by SAHEBRAO DHANRAJ BHOYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=201303bc41ec1fa4d14ccef33019b230317b039f951887dd25d72febda91bf82, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9F3A08DCEC2321C344A1916033CF8C938EFBE80C42926638012D340624F73C19, cn=SAHEBRAO DHANRAJ BHOYE
Date: 2023.03.20 16:27:34 +05'30'

**( साहेबराव भोये )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व ), मुंबई-५१.
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा ), मुंबई / नागपूर
५. मा.मंत्री (म.व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. निवड नस्ती, का-१०.